निसर्ग पर्यटन स्थळांचा विकास या योजनेतंर्गत ६ अतिरिक्त पदांना दि.१/०३/२०१५ ते २९/०२/२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : निसप-२०१५/प्र.क्र.३२/फ-५**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २४ फेब्रुवारी, २०१५

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक,महसूल व वन विभाग क्रमांक:- संकीर्ण-२०१०/प्र.क्र.१९८ /शिकाना/फ-५, दि. २२.१२.२०१०.
२) शासन निर्णय क्रमांक चाबाप्र-२०१३/प्र.क्र.१९६/फ-५, दि.२८/२/२०१४
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा. नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-३/ योजनेत्तर/ प्र.क्र.४५/(१४-१५)/१८८४, दि. ०६/०२/२०१५
४) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१ दि.२० फेब्रुवारी, २०१५

**प्रस्तावना :-**

निसर्ग पर्यटन स्थळांचा विकास या योजनेतंर्गत सांगली जिल्हयातील कडेगांव तालुक्यातील मौजे सोनसळ येथील चौरंगीनाथ या पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१०/प्र.क्र.१९८/शिकाना/फ-५, दि.२२/१२/२०१० अन्वये ६ अतिरिक्त पदांच्या निर्मितीस मंजूरी देण्यात आली आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दिनांक ०६/०२/२०१५ च्या पत्रान्वये ६ अतिरिक्त पदांना दि.१/३/२०१५ ते २९/२/२०१६ या कालावधीपर्यत पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाकडे संदर्भ क्र. ३ नुसार प्रस्ताव मंजूरीसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय :**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्र क्र. ३ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये मान्यता देण्यात आलेल्या वनरक्षकांची २ व पहारेकरी यांची ४ अशा एकूण ६ पदांना वित्त विभागाच्या संदर्भाधिन शासन निर्णय क्रमांक ४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन दि.१/०३/२०१५ ते २९/०२/२०१६ पर्यत पुढे चालू ठेवण्यास मुदत वाढ देण्यात येत आहे. सदर ६ पदांचा तपशिल खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | वनरक्षक | रु.५२००-२०२०० + ग्रेड पे रु.१८०० | २ |
| २ | पहारेकरी | रु.४४४०-७४४० + ग्रेड पे रु.१३०० | ४ |

उपरोक्त पदांचा वेतन व भत्यांचा खर्च मुख्य लेखा शिर्ष २४०६- वनीकरण व वन्यजीवन ८०० (०२) इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२)(०६) इकोटुरिझम (२४०६ २२९५) या लेखाशिर्षा खाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणा-या निधीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२४१६१२४६३४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.24 16:22:49 +05'30'

**(डॉ. यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास)/(कार्मिक), म.रा.नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.
४) उप विभागीय वनाधिकारी, सांगली.
५) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
६) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, सांगली/कोल्हापूर
९) निवडनस्ती , फ-५ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२